GR-200404071449560001-0100

शासकीय अधिका-यास गट-अ च्या राजपत्रित पदावर कायमपणाच्या फायद्याचे प्रमाणपत्र देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांकः स्थाप्रन-1099/प्र.क्र.48/99/13-अ,
दिनांक 18 ऑगस्ट, 1999.

पहा :- (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-1075/दहा, दिनांक 19 सप्टेंबर, 1975.

(2) शासन परिपत्रक क्रमांकः स्थाप्रप-1093/2640/प्र.क्र.98/93/13-अ, दिनांक 16 डिसेंबर, 1995.

परिपत्रक :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-1075/दहा, दि.19 सप्टेंबर, 1975 या अनुसार कायमपणाचे फायदे मिळण्यास पात्र होणा-या प्रत्येक अस्थायी कर्मचा-यांच्या बाबतीत त्या कर्मचा-यांची नियुक्ती करण्यास सक्षम असणा-या अधिका-याने तो कर्मचारी कायमपणाचे फायदे मिळण्यास पात्र होत आहे अशा आशयाचे प्रमाणपत्र प्रथम पदावरील नियुक्तीच्या संदर्भात देणे आवश्यक आहे. अशी प्रमाणपत्रे उपरोक्त दिनांक 16/12/1995 च्या परिपत्रकात विहित केलेल्या नमुन्यात देण्यात यावीत असे आदेश देण्यात आले आहेत.

2. राजपत्रित अधिका-यांना ते धारण करीत असलेल्या पदावर स्थायी करण्याच्या कार्यवाहीस विलंब होणार असल्यास, केवळ एवढ्याच त्रुटीमुळे संबंधित अधिकारी कोणत्याही लाभापासून वंचित राहू नये (उदा. भा.प्र.से. नामनिर्देशन) या दृष्टीकोनातून पात्र अधिका-यास राजपत्रित पदावर स्थायीत्व लाभ प्रमाणपत्र देऊन स्थायी अधिका-यांना अनुज्ञेय असलेले लाभ मिळण्यास ते पात्र समजले जाण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत विचार करुन शासन आता असे आदेश देत आहे की, गट-अ च्या अधिका-यांना पूर्वी अराजपत्रित पदावर स्थायीत्व लाभ प्रमाणपत्र मिळालेले असले तरीही ते धारण करीत असलेल्या गट-अ च्या पदावर उपरोक्त दिनांक 19/9/1975 च्या आदेशातील विहित अटी पूर्ण करीत असल्यास त्यांना स्थायीत्व लाभ प्रमाणपत्र देण्यात यावे. सदर प्रमाणपत्र उपरोक्त दि.16/12/1995 च्या परिपत्रकात विहित केलेल्या नमुन्यात देण्यात यावे. कायमपणाच्या फायद्याचे प्रमाणपत्र योग्य त्या सक्षम प्राधिका-यांच्या सहीने व विहित नमुन्यात देण्यात येईल, याची दक्षता घ्यावी.

3. मंत्रालयीन विभागांनी सदर आदेश त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांच्या/कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत. मंत्रालयीन विभागांनी गट-अ च्या अधिका-यांना स्थायीत्व लाभ प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही त्वरित सुरु करावी व त्या संबंधीचा अहवाल पुढील तीन महिन्यांत सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावा.

4. सदर आदेश वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक.सीआर-517/99/सेवा-9, दिनांक 30/6/1999 द्वारे दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना. ना. भडीकर, )
अवर सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,

(कृ.मा.प.

एच-669(5000-8-99)

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग (जादा 20 प्रतींसह),
निवड नस्ती.

---

* पत्राने.